माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन आदेश क्रमांकः मावज-२०१७/प्र.क्र.२५ (१२)/३४-अ,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ३१ मे, २०१७

**शासन आदेश: –**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने आणि पदावधी पूर्ण होण्यापूर्वी बदली प्रस्तावित असलेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत उक्त अधिनियमाच्या कलम ४ (३)(दोन) मधील तरतूदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्वमान्यतेने माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील गट-ब संवर्गातील खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची कामकाजाच्या व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | सध्याचे पद व ठिकाण | बदलीनंतरचे पद व ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| | श्री. विष्णू काकडे | माहिती अधिकारी,<br>रायगड-अलिबाग | सहायक संचालक (माहिती),<br>मुख्यालय, मुंबई |

२. वरील अधिकाऱ्यांना बदलीच्या पदावर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर तात्काळ रुजू होऊन आवश्यक अहवाल सर्व संबंधित कार्यालयांस तसेच शासनास विनाविलंब सादर करावा.

३. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी बदलीच्या पदस्थापनेत बदल करण्यासाठी प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास त्यांच्या विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्याबाबतचा प्रस्ताव महासंचालक यांनी शासनास सादर करावा.

४. बदली करण्यात आलेल्या उपरोक्त अधिकाऱ्यांचे दि.३१ मे, २०१७ पर्यंतचे वेतन हे सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयाने काढावे व दि.१ जून, २०१७ पासूनचे वेतन बदलीने पदस्थापना देण्यात आलेल्या कार्यालयाने काढावे. या संदर्भातील आवश्यक ती कार्यवाही संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५३११३४४१७६३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramkisan Narayanrao Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e613209e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2017.05.31 13:47:31 +05'30'

**(रा. ना. मुसळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
२. मा. राज्यमंत्री (मा.व ज.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. सचिव (मावज) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व परिक्षा), मुंबई,
६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
७. संचालक (माहिती)(प्रशासन)/ (वृत्त व जनसंपर्क)/ (माध्यम समन्वयक), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
८. संचालक (माहिती), नागपूर-अमरावती विभाग, नागपूर,
९. संचालक (माहिती), मराठवाडा विभाग, औरंगाबाद,
१०. उपसंचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली,
११. उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१२. सर्व विभागीय माहिती कार्यालये,
१३. जिल्हा माहिती अधिकारी, रायगड-अलिबाग,
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड-अलिबाग,
१५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१७. संबंधित अधिकारी, (मावज मार्फत)
१८. सामान्य प्रशासन विभाग /का.१२, ३४,
१९. निवड नस्ती (का.३४-अ)